**<u>महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी</u> मार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कर्ज पुरवठा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१६५/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक :- ०२ नोव्हेंबर, २०२०.**

**<u>प्रस्तावना</u> :-**

राज्यातील नागरी स्थानिक स्वराज संस्थामार्फत केंद्र व राज्य शासन पुरस्कृत किंवा स्वनिधीतून पायाभूत सुविधांच्या योजना राबविण्यात येत असतात. तथापि, नागरी स्थानिक स्वराज संस्थांची आर्थिक स्थिती सदर प्रकल्पाची कामे करण्यासाठी सक्षम नसल्याने सदर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना इतर आर्थिक संस्था/बँका याकडून कर्जाची उभारणी करावी लागते. पण सदर कर्ज उभारण्यास नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अडचणी निर्माण होतात. त्यामुळे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत राबविण्यात येत असलेल्या सदर प्रकल्पासाठी कर्ज उभारणीस सहाय करण्यासाठी महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर फंड या ट्रस्टची (मुंन्फ्रा) स्थापना शासनाच्या शासन निर्णय क्रमांक एमआरडी-१५०१/प्र.क्र.२५२/नवि-१०, दिनांक १९.०७.२००२ अन्वये करण्यात आली आहे. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना शासनाकडून फक्त अनुदान घेऊन खर्च करण्यापासून परावृत्त करुन किमान काही कामांसाठी कर्ज घेऊन त्याद्वारे विकास कामे हाती घेण्यास प्रवृत्त करण्याच्या उद्देशाने सदर सुलभ कर्ज योजना राबविण्यात येत असून, या योजनेच्या बळकटीकरणासाठी पुरेशी रक्कम मुन्फ्राकडे उपलब्ध असणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी मार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कर्ज पुरवठा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सदर प्रयोजनासाठी नगर विकास विभागाच्या मंजूर नियतव्ययामधून महाराष्ट्र नागरी पायाभूत निधी (MUIF) अंतर्गत महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड (MUIFTCL) मार्फत महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनीला निधी उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने <u>शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे</u>.

**(अ)** राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना नगर विकास विभागातून विविध योजनांतर्गत अनुदान उपलब्ध करुन दिले जाते. या नगर विकास विभागाच्या मंजूर नियतव्ययामधूनच १ टक्के किंवा जास्तीत जास्त रुपये ५० कोटी इतकी रक्कम मुन्फ्रामार्फत कर्ज देण्यासाठी म्हणून “महाराष्ट्र नागरी मूलभूत सुविधा निधी” (MUIF) अंतर्गत महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड (MUIFTCL) मार्फत महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनीला उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**(ब)** तदनंतरच्या पुढील वर्षांमध्ये, वरीलप्रमाणे निधी संबंधित कंपनीला उपलब्ध करुन देण्यापूर्वी, कंपनीकडून कर्ज उपलब्ध करुन देण्यासाठी उपलब्ध असलेली रक्कम, संबंधित वर्षात कंपनीकडे

कर्जासाठी प्राप्त झालेली प्रकरणे व प्राप्त होणारी संभाव्य प्रकरणे यांचा विचार करुन रुपये ५० कोटीच्या मर्यादेत नगर विकास विभागाच्या मंजूर नियतव्ययामधून रक्कम महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड (MUIFTCL) कंपनीला उपलब्ध करुन देण्यात येईल.

**(क)** कोणत्याही वित्तीय वर्षाच्या अखेरीस महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड (MUIFTCL) मार्फत महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनीकडे वर्ग केलेली रक्कम विनावापर उपलब्ध राहिली तर त्या संबंधित आर्थिक वर्षाच्या शेवटच्या दिवसापूर्वी अशी रक्कम शासन जमा करण्याबाबत महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनीला कळविण्यात येईल.

**(ड)** याबाबतचा खर्च नगर विकास विभागाच्या मंजूर नियतव्ययातून भागविण्यात येईल.

०२. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाकडून प्राप्त अभिप्राय विचारात घेऊन त्याबाबतच्या मंत्रीमंडळ निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०२१४३४०१३८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2020.11.03 16:47:54 +05'30'

**(पां. जो. जाधव)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
३. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी, मुंबई.
९. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई उपनगर.
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. आयुक्त, सर्व महानगरपालिका
१४. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ सर्व नगरपंचायती
१५. निवडनस्ती, (नवि-३३).